स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एक
छत्र योजनेंतर्गत पुरातत्व व वस्तुसंग्रहालये
संचालनालय यांना निधी वितरीत करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

## शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र. ४६४/सां.का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १४ ऑगस्ट, २०२३

वाचा :- १) शासन पत्र, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. संकीर्ण-८२२२/ प्र.क्र. ४१३/ सां.का. ४, दिनांक १७ फेब्रुवारी,२०२३
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. स्वाअम-२०२३/ प्र.क्र.४९/ सां.का.३, दिनांक १६ मार्च, २०२३
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. स्वाअम-२०२३/ प्र.क्र.५०/ सां.का.३, दिनांक १६ मार्च, २०२३
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. स्वाअम-२०२३/ प्र.क्र.४६/ सां.का.३, दिनांक १४ मार्च, २०२३
५) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. स्वाअम-२०२३/ प्र.क्र.४८/ सां.का.३, दिनांक १६ मार्च,२०२३
६) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. स्वाअम-२०२३/ प्र.क्र.१९२/ सां.का.३, दिनांक २६ जुलै,२०२३

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या कोअर समितीच्या दिनांक ५ डिसेंबर, २०२२ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त उपर्निर्दिष्ट क्र.१ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सदर इतिवृत्तानुसार स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवा निमित्त पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय या कार्यालयास विविध उपक्रम / कार्यक्रमांसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात आली आहे. त्यानुसार उपर्निर्दिष्ट क्र. २, ३, ४,५ व ६ येथील शासन निर्णयान्वये पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय सदर कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील पत्रान्वये प्रसृत कोअर समितीच्या इतिवृत्तातील ज्या विभाग / कार्यालयाकडून त्यांच्या उपक्रम / कार्यक्रमाच्या प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्या आहेत त्या विभाग / कार्यालयांस “स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एक छत्र योजनेंतर्गतच्या तरतूदीतून खालील तपशिलानुसार एकुण रुपये ९,९०,७१,७४५/- ( अक्षरी रुपये नऊ कोटी नव्वद लाख एकाहत्तर हजार सातशे पंचेचाळीस फक्त ) इतका निधी

संबंधित विभाग/कार्यालयांस वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांच्या प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांचा तपशील खालीलप्रमाणे :-**

| अ.क्र. | प्रशासकीय मान्यता देण्यात आलेले काम | शासन निर्णय दिनांक | रक्कम |
|---|---|---|---|
| १ | स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त संग्रहालयामधील पुरावशेषांचे 3D प्रिंटिंग करण्याकरीताच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत | शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र-स्वाअम . २०२३/प्र.क्र.४९/सां.का.३ दि.१६.०३.२०२३ | रु. २,०५,००,०००/- |
| २ | स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त संग्रहालयामधील पेंटिंग व पुरावशेषांचे छायाचित्रण करण्याकरीताच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत. | शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र-स्वाअम . २०२३/प्र.क्र.५०/सां.का.३ दि.१६.०३.२०२३ | रु. २,७५,००,०००/- |
| ३ | स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त रत्नागिरी येथे कातळशिल्पावरील परिसंवाद आणि विभागवार परिसंवादाचे आयोजन करण्याच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत | शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र-स्वाअम . २०२३/प्र.क्र.४६/सां.का.३ दि.१४.०३.२०२३ | रु. १,९२,००,०००/- |
| ४ | स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त संग्रहालयातील पुरावशेषांचे 3D स्कॅनिंग करण्याकरीताच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत | शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र-स्वाअम . २०२३/प्र.क्र.४८/सां.का.३ दि.१६.०३.२०२३ | रु. ३,०८,७५,०००/- |
| ५ | स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवानिमित्त दि. १८ मे,२०२३ रोजी “जागतिक संग्रहालय दिवस” या कार्यक्रमावरील खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत. | शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र-स्वाअम . २०२३/प्र.क्र.१९२/सां.का.३ दि.२६.०७.२०२३ | रु. ९,९६,७४५/- |
| | | एकूण | रु. ९,९०,७१,७४५/- |

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, मुख्य लेखाशिर्ष २२०५, कला व संस्कृती, (१०२) कला व संस्कृती, (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम, (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. सदर खर्च करण्यासाठी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्यात येत असून, त्यांनी घोषित केलेले अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

०४. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांची तसेच सर्व संबंधितांची राहील.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०८१४१६५०२२२७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2023.08.17 17:39:29 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री तथा अध्यक्ष धोरण समिती यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा उपाध्यक्ष धोरण समिती यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) तथा अध्यक्ष कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री, सामाजिक न्याय, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. मंत्री, कौशल्य विकास, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. मंत्री, आरोग्य, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा. मंत्री, पर्यटन, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. मंत्री, ग्रामविकास, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०.मा. मंत्री, महिला व बालविकास, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११.मा. मंत्री, क्रीडा, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२.मा. मंत्री, शालेय शिक्षण, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१३.मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४.मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
१५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास व पंचायत राज विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२०.उप सचिव ( सां.का.१,२,४ व अर्थसंकल्प ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय,
२१.संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, मुंबई
२२.संचालकमुंबई ,पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय ,
२३.कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर शासन निर्णयामध्ये नमूद नियंत्रण अधिकाऱ्यांना बीम्स प्रणालीवर निधी उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी.
२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२५.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२६. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
२७.महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
२८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
२९.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
३०.निवड नस्ती, सां.का.४.